

'अस्फूट शब्दकण' ची प्रत
माननीय राष्ट्रपती प्रतिभाताई पाटील याना देताना
कवी प्रकाश वेळीप व अन्य

प्रकाश शंकर वेळीप
03/03/99

# वंशज

(कविता संग्रह)

कवी

श्री. प्रकाश शं. वेळीप

कृती : **वंशज**

प्रकाशिका : सौ.ज्योती प्रकाश वेळीप
सरस्वती निवास,
कुस्मण, केपे-गोवा, ४०३ ७०५
दूरभाष:०८३२-२६६२३४१
०९८२२१२१७४०

मुखपृष्ठ सजावट : कु. प्रयुज प्रकाश वेळीप

प्रथमावृत्ती: २६ फेब्रुवारी २०११
माघ व. नवमी, शके १९३२

मुद्रक: क्लासिक प्रिंटर्स
बाणसाय - कुडचडे-गोवा
४०३ ७०६
दूरध्वनी : ०८३२-२६५१५३०

सहयोग: ७०/-



# समर्पण

अनुसूचित जमातीच्या अधिकारासाठी
लढणाऱ्या माझ्या असंख्य
समाजबांधवांच्या चरणी...

प्रकाश शं वेळीप

# वंशज-श्रध्दाळू मनाचे भावपुष्प

श्री. प्रकाश शंकर वेळीप, माजी सहकार व शिक्षण मंत्री, एक शिक्षक, समाजसेवक असे विविध पैलू असणारे एक संवेदनशील व्यक्तिमत्त्व आहे. या संवेदनशीलतेतून त्यांच्या मनातील भावनांना शब्दरूप आलेले आहे. त्यामुळेच समाजकारण व राजकारणातल्या गतीशील जीवनात व्यस्त असूनही त्यांच्याकडून साहित्यशारदेची सेवा घडली.

'वंशज' हे त्यांचे तिसरे पुस्तक. एकूण सत्तावन कवितांचा समावेश असलेल्या या कवितासंग्रहातील बहुतेक कवितांमध्ये त्यानी आपल्या मनाशी केलेला संवाद आहे. मनाने केलेले चिंतन, ईश्वराला केलेली प्रार्थना, समाजांच्या भविष्यकाळासाठी आणि सुखासाठी ईश्वराला घातलेले गाऱ्हाणे इत्यादी संबधाने अत्यंत सात्त्विक स्वभावाच्या वेळिपानी देवासमोर प्रांजळपणे व्यक्त केलेले आहे.

सदर कवितासंग्रहातील पहिल्याच 'चिरंतर' कवितेत स्वतःच्या आयुष्यासंदर्भात प्रार्थना आहे..

' का रे भगवंता नाही येत दया माझी
नित्य गातो तुझी सांज सकाळ आरती '

अशी खंत व्यक्त करणारे हे मन अतीव विश्वासाने त्याच देवाच्या पायाशी लोळण घेते आणि

'प्रभो, तूज वीण हे जग सारे व्यर्थ आहे.
तूच आहे चिरंतर साऱ्यांचा तू परमेश्वर'

या शब्दात त्याच्या सार्वभौमत्वाची ग्वाही देऊन मोकळे होताना दिसते. पुढे 'कालचक्र, तुझ्या सोबतीत, मी कोण, क्षमा, हे प्रभो, काठी, घडू दे वगैरे कवितांतून त्याची जाणीव सतत दिसते. त्या सर्वात्मक परमेश्वराकडे केलेला कविमनाच्या सात्विकतेचा परमोच्छ बिंदू आहे असे दिसते. ह्या ओळी वाचताना ज्ञानेश्वरीमधील 'पसायदानाची' आठवण होते. ह्या कवितांची शैलीही थोडी वेगळ्या घाटणीची आहे. ती स्वरांवर तरंगणारे शब्द घेऊन येते नि लयबध्दतेमुळे विचारांबरोबरच नादाचा एक सुंदर गोफ नकळत्त विणून जाते.

ईश्वरावर अगाध श्रध्दा असणारे त्यांचे कविमन अत्यंत व्यस्त जीवनामध्ये किती चिंतनशील बनते ते 'स्वप्ने', 'यश', 'राजकारण', 'क्षमस्व', 'समोरचे झाड', प्रांगण, 'मन', आत्मसंतुष्ट,' 'सहकार', 'महागाई', 'तारणकर्ता', 'माणसास', 'जीवन', 'घर', 'महाराजा,' 'पालापाचोळा', 'सुखदुःख', 'निशाणी', 'अधोगती', 'युग', 'भूमिपुत्र', वगैरे कवितांमधून जीवन ,समाजकारण व राजकारण यासंबधीचे चिंतन डोकावते.

मात्र काही ओळीत निराश झालेले मन दुसऱ्याच क्षणी आपल्या आत्म शक्तीची जाणीव करून देऊन 'होऊ आम्ही होऊ विजयी, असा आत्मविश्वास प्रगट करते. यातून समाजचिंता व आपल्या मातृभूमीवरील प्रेम यांची प्रकर्षाने जाणीवही करून देते. 'मायभूमी, रामजन्मभूमी, धागा, देश, यशोगाथा, भूमिपुत्र, माझा गांव' वगैरे कवितांतून भारतदेश व गोमंतकभूमीबध्दलचे निस्सीम प्रेम व्यक्त होते.

त्यानी आपल्याच जीवनाचा मागोवा घेण्याचाही काही कवितांतून प्रयत्न केलेला आहे. आपले बालपण व प्रौढत्वच्या या आठवणींबरोबर आजची आपली सामाजिक स्थिती, कर्तृत्व पाहून तृप्त होणारे 'आयुष्याच्या काठावरून' जीवनाकडे डोकावताना दिसते आणि याच कृतकृत्य भावनेने आईच्या चरणाशी कृतज्ञ होते 'आईस' या कवितेत आपल्या यशस्वी आयुष्याचे श्रेय आईला देताना कवी म्हणतो.

'तुझ्या सावलीत वाढलो तुझ्या सावलीत घडलो'

अनुसूचित जाती-जमातींचा कैवार, शेतकऱ्यांच्या जीवनाबध्दलची तळमळ, सहकारक्षेत्रातील अनुभव, अमेरिकेचा प्रवास, राजकारणातील सुख-दुःख, चिंता, अडचणी वगैरेची त्यांची वाटचाल अनेक कवितांमधून उलगडून येते.

कवितेची निर्मिती त्यांची शेवटी प्रेयसी होऊन अवतरते आणि ती भेटल्यानंतर कवी त्यात रमून जातो. त्या रममाण स्थितीतच एका नवीन कवितेचा जन्म होतो. अशा निर्मिती-प्रक्रियेच्या सहवासातून अवतरते ती 'निरागस' सारखी एक निरागसता.

आपण शेतकरी कुटुंबात जन्म घेतला याचा या कविमनाला सार्थ अभिमान आहे. याची प्रचिती पदोपदी जाणवते.

'तू आहेस बळीराजाचा वंशज
धन्य ते तुझे अपूर्व पूर्वज
ज्यानी घडविला उज्ज्वल इतिहास'

अशा शब्दांतून त्या वंशजांचा सन्मान करणारा 'वंशज' हा कवितासंग्रह म्हणजे श्री. प्रकाश शं. वेळीप या व्यक्तिमनाचा अत:स्फूर्त उद्‌गार आहे. जेवढा धाडसी आणि निर्मळ तेवढाच चिंतक आणि स्वाभिमानी सुध्दा ! यातील कविता म्हणजे एक विचारशलाका आहे. ती सजग मनात सतत धगधगणारी ती एक विचारज्योती आहे. ती अशीच आपल्या प्रकाशाने समाजाला मार्गदर्शक ठरो हीच ईश्वरचरणी प्रार्थना !

सौ. आशा अशोक मणगुतकर

# मनोगत

'वंशज' हे माझे तिसरे पुस्तक. कविता संग्रह. हा संग्रह वाचकाच्या हाती देताना आनंद होत आहे. मी कोणी कवी किंवा लेखक नव्हे. निव्वळ एक साहित्य प्रेमी. लहानपणासून वाचनाची व लिहिण्याची आवड होती. या आवडी पोटी मी साहित्याकडे ओढला गेलो. माझे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण सरकारी माध्यमिक विद्यालय बाळ्ळी येथे झाले. त्या वेळी अकरावी म्हणजे मॅट्रिक होती. माझे मॅट्रिक पर्यंतचे शिक्षण मराठीतून झाले. त्या कालात मी शाळेच्या वाचनालयातील बरीच पुस्तके वाचून काढली होती. माझे निबंध मराठीचे शिक्षक वर्गात वाचून दाखवायचे. तालुक्या पातळीवर निबंध स्पर्धात बक्षिसे मिळायची. तेथे मला सुरवातीला लिहिण्याची संधी मिळाली.

मॅट्रिक नंतर मी चौगुले कॉलेज मधून विज्ञान शाखेची पदवी मिळवीली. लिहिण्याचे वाचण्याचे थोडे कमी झाले. घरी माझे काका माझ्या लहानपणी 'दासबोध' वाचायचे. आम्हाला ते जवळ घेऊन ऐकायला सांगायचे व अर्थपण स्पष्ट करायचे. लहानपणी जत्रातून पौराणिक पुस्तके विकत घेण्याची मला आवड होती. तेही माझे बरेच वाचन झाले होते.

शिक्षणपूर्ण झाल्यानंतर नोकरी निमित्ताने मी डिचोलीला तीन वर्षे राहिलो. तेथे असताना परत वाचन व लिहिणे सुरू झाले. तेथे आयोजित केलेल्या कवी संमेलनातही एक दोनदा भाग घेतला होता. मधे मधे वर्तमान पेपरमध्ये लिहिण्याची संधी मिळायची. आमदार झाल्यावर या लिहिण्याचा मला फायदा झाला. मतदार संघातील बऱ्याच बातम्या मी स्वत:लिहून प्रसिध्दीसाठी द्यायचा. बातम्या वर्तमानपत्रातून प्रसिध्द व्हायच्या. अनेक वेळेला मग वर्तमान पत्रातून लेख लिहिण्याची विनंती यायची. अनेक क्षेत्रात काम करत असल्यामुळे आजपर्यंत अनेक विषयावर वर्तमान पत्रातून लेख प्रसिध्द झाले आहेत.

साहित्याच्या आवडीतूनच मी अनेक मराठी साहित्य संमेलनाला हजर राहिलो आहे. त्यात गोमंतकीय, महाराष्ट्रातील व विश्वसंमेलनाचा सहभाग आहे. हल्लीच अमेरीकेमध्ये भरलेल्या पहिल्या विश्व मराठी साहित्य संमेलनासाठी मी व माझे दोन अन्य मित्र याच प्रेमापोटी आम्ही अमेरीकेला जाऊन आलो.

२४ व्या मराठी साहित्य संमेलनामुळे मी आणखी साहित्याकडे ओढला गेलो. हे भरविण्याची जबाबदारी आमच्या जनसेवा मंडळावर सोंपविली होती.

‘जनसेवा मंडळाचा’ मी अध्यक्ष आहे. मी या संमेलनाचा स्वागताध्यक्ष म्हणून काम पाहिले. हे संमेलन सर्वांच्या सहकार्याने भव्यदिव्य झाले होते. त्यासंमेलनाचे आम्ही दर वर्षी वर्धापन दिन साजरे करत असू. यंदा त्याचा दशक महोत्सव. हा दशक महोत्सव २६ व २७ फेब्रुवारी रोजी फातर्पा येथे संपन्न होत आहे. त्या संधीचा फायदा घेऊन ‘वंशज’ प्रकाशित करण्याचे ठरविले.

‘वंशज’ मध्ये मी माझ्या मनातील अस्वस्थता व्यक्त केली आहे. सभोवार काय चालले आहे ते बघून मनातील हुंकार व्यक्त झाले आहेत. हे हुंकार मी पुस्तक रूपाने प्रकाशीत करण्यासाठी व्यक्त केले नव्हते. केवळ माझ्या समाधानासाठी ते मी व्यक्त केले होते. पेपरवर विचार व्यक्त झाल्यावर एक प्रकारे समाधान व्हायचे. यातील बऱ्याच कवीता ‘कुशावती’ मासिकमधून प्रकाशित झाल्या आहेत. कुशावती मासिकाने खऱ्या अर्थाने आम्हाला लिहिण्याचे व्यासपिठ दिले. त्या बद्दल मी ऋणी आहे. त्यामुळेच ‘अस्फूट शब्दकण’ पुस्तक रूपाने प्रकाशित झाले. ज्यात काही कवीता काही लेख या स्वरूपातील ते पुस्तक आहे. हे पुस्तक मला देशाच्या राष्ट्रपती माननिय प्रतीभाताई पाटिल गोव्या भेटीवर आल्या असता देण्याची संधी मिळाली. मोठे समाधान लाभले.

त्याच्या अगोदर कॉलेजमध्ये असताना लिहिलेले ‘स्वीकार’ नाटक पण प्रकाशीत झाले होते. केपे साहित्य संमेलनामुळेच पुस्तके प्रकाशीत करण्याची मला प्रेरणा मिळाली.

कुशावती मासिक मधून कविता प्रसिध्द झाल्यावर प्रतिक्रीया देणारे बरेच वाचक भेटले. त्यानी लिहिण्याचा आग्रह धरला. तसेच मासिकाचे दोन्ही संपादक प्रा. उल्हास प्रभू देसाई व आत्ताचे डॉ. अशोक मणगुतकर यांचे मला बहुमूल्य मार्गदर्शन लाभले. ते असेच रहावे ही अपेक्षा. सौ. आशा अशोक मणगुतकर यानी या कवितासंग्रहाला श्रध्दाळू मनाचे भावपूष्प अर्पून मला प्रोत्साहित केल्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे. त्यांचे ही असेच मार्गदर्शन याहीपुढे अपेक्षित आहे.

दशक महोत्सवासाठी झटणाऱ्या माझ्या सर्व मराठी साहित्य प्रेमीचा मी फार आभारी आहे. तसेच २४ वे मराठी साहित्य संमेलन दहावर्षापूर्वी केपे येथे यशस्वी करण्यासाठी जे जे झटले त्या सर्वांचा पण ऋणी आहे.

माझ्या प्रत्येक कार्यात संपूर्ण सहकार्य करणारी माझी पत्नी सौ. ज्योती वेळीप माझी तीन्ही मुले कु. प्रज्वल, कु.श्रेया व कु. प्रयुज यांचे पण वेळोवेळी सहकार्य मिळाले. ‘अस्फूट शब्द’ कणासाठी प्रयुजने मुखपृष्ट तयार केले होते. तसेच वंशजलापण त्याचेच मुखपृष्ठ लाभले आहे.

अन्य बऱ्याच जणाचे मोलाचे सहकार्य हा संग्रह प्रकाशित करताना लाभले. त्या सर्वांचा मी आभारी आहे.

प्रकाश शं. वेळीप

# बांधणी

# चिरंतर

का रे भगवंता
नाही येत दया माझी
नित्य गातो तुझी
सांज सकाळी आरती
असता मी संकटी
का रे अंत बघसी
होऊनी लीन तुझ्या चरणी
करी धावा उपाशी

असता तू दयाघन
का घाबरे मनोमन
तूच पाव या समयी
तुझ्या दर्शनी येईन पायी
प्रभो तूज वीण हे
जग सारे व्यर्थ आहे
तूच आहे चिरंतर
साऱ्यांचा तू परमेश्वर

# भूमिपुत्र

माझ्या गोव्याच्या भूमीत
भूमीपूत्र घाम गाळीतो
रात्रदिन मर मर मरतो
आणि शेतात पिक पिकवतो
माझ्या गोव्याच्या भूमीत
डोंगर कपारी वसविले गांव
केले पर्यावरणाचे रक्षण
पण आज नाही कुठे नाव
फिरतो न्यायासाठी वणवण
माझ्या गोव्याच्या भूमीत
राहिला वंचित शिक्षणापासून
नाही केली कुणी वासपुस
अंगठयाने नेली सारी जमीन
बसला घरी होऊनी कासावीस
माझ्या गोव्याच्या भूमीत
कंठणे जीवन या महागाईत
येतो जीव मेटाकुटीस
कोणी नाही देत मदतीचा हात
निवडणूकीत पडे पैशाचा पाऊस
माझ्या गोव्याच्या भूमीत
जाऊनी व्यसनाच्या आहारी
झाला पुरता कर्ज बाजारी
बायका मुलाना टाकूनी उघड्यावरी
होई मरणाचा वाटेकरी
माझ्या गोव्याच्या भूमीत

# देश

संधी साधू माणसे
भेटती पावलो पावली
गरजसरो वैद्य मरो
आहे आज वृत्ती बळावलेली
नाही कोणी त्याला रोखू शकत
संख्या त्याची आहे वाढत
स्वार्थात सारे आहेत रममाण
दुसऱ्यासाठी स्थान झाले गौण
आज देश हा
असा का व्हावा
ही नव्हती कधी
आमुची परंपरा
श्रेष्ठ आहे आमुची संस्कृती
परम कर्तव्य आहे टिकविणे ती
माणसे जोडणे आमुचा धर्म
सेवा आहे आमुचे कर्म
नको आम्हा अधोगती
हवी नेहमी प्रगती
सोडू या कुपमंडल वृत्ती
बनवू या देश शक्तीशाली

# कालचक्र

कोणी कोणाचा नसतो
जो तो अपुला स्वार्थ बघतो
ज्याला आपण आपला मानतो
काम झाल्यावर पाठ फिरवितो

हाच जगाची न्याय खरा
हिच जगाची परंपरा
नाही कोणी ती मोडू शकत
पुढे यायला कुणी नाही धजत

असेच हे चालायचे
जो तो म्हणे उपाय नाही
आपलेच आपण साधून घ्यायचे
दुसऱ्यांचे भले करायचे नाही

आपुले तेवढे व्हायला हवे
गरज सरो की वैद्य मरो
कालचक्र हे असेच धावे
प्रार्थीतो देवा, हे मागे फिरो

# स्वप्ने

माणूस जीवनात मोठी स्वप्ने बघतो
सत्यात उतरविण्यासाठी धडपडतो
स्वप्नाचा पाठलाग करतो
पडतो, रक्त बंबाळ होतो
तरी ही जो नाद सोडत नाही
तोच स्वप्नाच्या जवळपास पोहचतो
आणि ज्याला परमेश्वराचा
आर्शिवाद लाभतो
त्याचीच स्वप्नापूर्तता होते
तोच माणूस जीवनात धन्य होतो
म्हणून माणसाने स्वप्ने बघायची
सोडायची का ?
तुम्हीच विचार करा
आणि ठरवा
माणसाने स्वप्ने
पहावी की नाही ते

# पैसा

जे काय चाललय
ते पाहून उबग येतो
कुठलेही क्षेत्र घ्या
आज ते पवित्र
राहिलेले नाही
स्वार्थ बोकाळत आहे
माणसाला दिसतो आहे
फक्त पैसा
माणूस फक्त
पैशामागे धावतो आहे
माणुसकी विसरत चालला आहे
स्वार्थाने आंधळा झालाय
नाते, निती
संस्कार, आचार, विचार
देशप्रेम
सारे काही
विसरत चाललाय
काय होणार या देशाचे ?
प्रश्न मनाला भेडसावत आहे
कोणती अद्‌भूत शक्ती
याला वाचवू शकेल ?

# युग

ऐकता विपरीत मनाविरूध्द
होऊन जाई मन सुन्न
न सुचे काही क्षणभर
वाटे मनोमनी खिन्न
हे असे का घडावे
जाई बुडूनी खोल विचारी
परी उत्तर न सांपडे
वाटे अस्वस्थता मग भारी
हा असे प्रभाव या युगाचा
चालले संपत आचार विचार
न उरले भय आता कुणा
स्वहितच येई उफाळून वर
याला कोण काय करणार
कालचक्र चाललेय बदलत
जो तो माने धन्य
न घाली कोणी लक्ष कशात

# ती

माझ्या आयुष्यात ती आली
तिने मला घडविले
तिने मला फुलविले
तिच्यामुळे मला खूप अनुभव मिळाले
खूप मानसन्मान मिळाले
अनेक यशाच्या शिखरावर पोहचविले
तिच्यामुळे अनेक सुखदु:खाचे क्षण पचवू शकलो
आज मी समर्थ उभा आहे
तो तिच्या मुळे
तिच्या शिवाय मला करमरत नाही
तिला मी विसरू शकत नाही
तिचा विरह सहन होत नाही
आज ती माझ्या जीवनाचा
अविभाज्य भाग बनली आहे
माझ्या रोमारोमात
ती भिनली आहे
तिच्या मुळेच आज मी आहे
ती आहे, ती आहे, सांगा पाहू ?
"---"
चूक !
ती आहे माझी
समाजसेवा

# शेवटचा तास

होता शेवटची तासिका सुरू
मुले लागली कुरकुर करू
नसे लक्ष मग शिकवणी कडे
लक्ष असे केवळ घंटे कडे

झाली एकदाची घंटा ठण्ठण्
'हुश्श्' करीत दप्तर वाजे सणसण
भरुनी दप्तर भराभरी
धावती मुले दाराकडे सारी

फुलून उठे सगळा परिसर
शाळे भोवती गरजे हरहर
ते वातावरण असे हर्षाचे
घरची ओढ ओढण्याचे

जो तो विसरूनी साराशिण
जाई घरी गात गाणे गुणगुण

# अधोगती

माणसा कुठे चाललास तू ?
लाभला सहस्त्र वर्षांनी तूज हा जन्म
परी झालास तूच तुझा शत्रू
फैलाविलास आतंकवाद जगी
माणसा कुठे चाललास तू ?
तुला कशाचे नाही पडले
स्वार्थात तू गेलास बुडून
भ्रष्टाचाराचा बनविलास सागर
माणुसकी तू तुडविलीस पायी
माणसा कुठे चाललास तू ?
होतास कोण तू झालास काय
इतिहासाकडे फिरविलीस पाठ
नितीमूल्ये गेलास विसरून
धरलीस अधोगतीची वाट
माणसा कुठे चाललास तू ?

# पुनर्जन्म

स्वप्नात माझ्या येऊ नको
उगाच मजला उठवू नको
झोपमोड माझी करू नको
खोटी आशा दाखवू नको
तू आहे एक स्वप्न कळी
न फुलणारी वेळी अवेळी
नाही तुझ्यात धाडस
सीमा पार करण्यास
सत्य पचवू तू नाही शकत
उगाच करण्या नाटक व्यर्थ
न मिळणाऱ्या आपण दोन रेषा
आहेत आपुल्या भिन्न दिशा
मार्ग माझा अडवू नको
बंधन कुणाचे तोडू नको
असेल विश्वास पुनर्जन्मावर
तर घडविल गाठ परमेश्वर

# यश

समोर उभा डोंगर आहे
मनात ठाम निर्धार आहे
इच्छा शक्तीचे बळ आहे
चढून शिखर गाठायचे आहे

दुरून डोंगर साजरे
जवळून काटे कपारी
हिस्त्र  स्वापदे स्वैर फिरे
पदोपदी लाभे दरी खोरी

हिंमत नाही सोडायची
जिद्दीने पावले टाकायची
पुढेच पुढे जायचे
शीण सारे विसरायचे

मनी धरी जो धैर्य
ज्याला नसे कशाचे भय
देती देव साथ त्यासी
तोच यश शिखरी पावशी

# राजकरण

राजकरण, राजकरण
तेव्हाचे आणि आताचे
तेव्हाचे बरे होते की आताचे
कुणी म्हणेल आताचे बरे
कुणी म्हणेल तेव्हाचे बरे
मी म्हणेन तेव्हाचे बरे होते

तेव्हाचे राजकारणाचा
मी एक भाग होतो
आम्ही राजकारणात शिरलो
समाज करणाचा भाग म्हणून
समाज सेवेची आवड म्हणून
निरपेक्ष भावनेने लोकसेवा म्हणून

आज निरपेक्ष भावना
लोप पावत चाललिय
समाज सेवेची जागा
स्वार्था ने घेतली आहे

जळी स्थळी पैशाचे राजकरण
वैयक्तिक स्वार्थ फोफावतोय
प्रत्येकाला दिसते फक्त खुर्ची
समाज सेवकांच्या ऐवजी
स्वार्थी, ढोंगी, खूनी, दरोडे
चोर, मटके वाले
भ्रष्टाचारी, आंगठेबहाद्दर
यांचा भरणा वाढत चाललाय
शॉर्टकट' पद्तीने श्रीमंत
व्हायचे आहे
तोंडी विकास, पोटात स्वार्थ
तोंडात 'आम आदमी'
डोक्यात पैसा
कसा चालणार हा देश
महागाई वाढतेय
भ्रष्टाचार बोकाळतोय
कुणाला पडून गेलेल नाही
जनता स्वस्थ
राजकरणी उन्मत्त
जनता डोळयावर पट्टी ओढून आंधळी
आता तुम्हीच ठरवा
तेव्हाचे राजकरण बरे होते की आताचे

# काठी

देवा तुझ्या द्वारी आलो
घेऊनी मी झोळी
नको पाठवू तू मज
माघारी खाली

घेऊनी आशा पोटी
आलो तुझ्या चरणी
तूच दाखव नीट वाट
आहे तुझी अगाध करणी

तू जाणे सर्व काही
तुला न लगे सांगणे
जाणून तू आहे
सगळयाचे मागणे

तू मज दे शक्ती
होण्या तुझी काठी
तुझ्या सानिध्यात मी
होईन धन्य कोटी कोटी

# मुके प्रेम

आई तुझ्या वीणा राहू कसा ग
नाही सहन होत तुझा मला वियोग
आहे मी तान्हे बाळ
बंदिस्त पिंजऱ्यात
नाही बाहेर येण्या
माझ्यात आहे बल
ऐकून माझा टाहो
येतेस तू भेटण्या रोज
भिती असूनी मनी
भरवितेस बाहेरूनी मज
गुन्हा असा आमुचा काय
म्हणूनी केलीस ताटातूट
का तोडिलेस आमुचे नाते
होतेय जगणे असय्य
भरवितोस तू खूप काही
आईची गोडी त्यात नाही
दोघावर आम्हा केलास आघाध
भेटणे तिचे ते नको करूस बंद
हे असे आईचे अतूट प्रेम
आहे चराचरी भरून
हा अगाध आहे निसर्ग नियम
नाही जाऊ शकत कोणी तो तोडून

# क्षमस्व

आयुष्याच्या सायंकाळी
गेलो दंगून भूतकाळी
लागले येऊ वर वर
सप्तरंगी अनेक तरंग
निघालो मी न्हाऊन चिंब
ती आईची माया
ते बालपण, ती भावंडे
आणि ते बाल मित्र
लागले जमू अवती भवती
घालून घिरक्या लागले गाऊ
तो शालेय काल
ते वर्ग मित्र
ते शिक्षक गुणीजन
गेले देऊन कानमंत्र
संस्काराचा पाया करुनी मजबूत
शिक्षण सागरी संपादण्याविद्या
घेतले कष्ट अपार
पडलो बाहेर जीवन नगरी
फिरलो वणवण अनेक ठाई
घेऊनी उरी भावी स्वप्ने
परीन आली न फळे त्वरीत

ध्यास घेऊनी जिद्दीचा
नाही सोडिला नाद
साधण्या स्वार्थ जनसेवेचा
करूनी मात असंख्य दरी
निघलो वर वर गाठीत शिखरे
यश आले दारी
न फिरलो माघारी
केली क्षितीजे काबीज
लाभले सोबती धिरोदत्त
आईचा हात ममतेचा
सदैव फिरला पाठीशी
लाभला आर्शिवाद देवाचा
ठाकला उभा खंबीर
आज या क्षणी
झालो तृप्त मनोमनी
असेल घडल्या चुका हातून
मागतो तुमच्या चरणी समस्व

# वंशज

तू आहेस बळीराजाचा वंशज
धन्य ते तुझे अपूर्व पूर्वज
ज्यानी घडविला उज्वल इतिहास
का समजसी तू स्वत:स निरर्थक
तू तर आहेस बळराजाचा वंशज

चूक नसे ही तुझी
तू गेलास अज्ञानाच्या वनवासी
तुला ठेविले वंचित सगळयानी
मुख्य धारेपासून करुनी जंगल वासी
तू तर आहेस बळीराजाचा वंशज

वर्ष हजार सोसून यायना
भोगिल्या मानहानी वेदना
त्या दु:खाचे झरे पाझरून
बनल्या आज नद्या महान
तू तर आहेस बळीराजाचा वंशज

आज तू होऊनी जागा
लागला गर्जू हक्काच्या भागा
नाही तुला कुणी शकणार अडवू
आठव तुझी ती वृत्ती लढावू
तू तर आहेस बळीराजाचा वंशज

यश तुझ्या पदरी हमखास
संपेल तुझे वनवासी दिवस
तूच स्वत:ला जाणून घे
मी होतो कोण आणि आज का मागे
तू तर आहेस बळीराजाचा वंशज

हो परावृत्त नको वाट चूकू
एकदा केली चूक नको पुन्हा वाकू
सोड सगळे नाद, अपप्रवृत्ती
घडव तू इतिहासाची पुनारावृत्ती
तू तर आहेस बळीराजाचा वंशज

# माझा गांव

माझा गांव माझा गाव
जिथे जन्मलो, जिथे वाढलो
जिथे खेळलो, जिथे पडलो
तो माझा गाव
आहे वसलेला डोंगर पायथ्याशी
नाव त्याचे आहे अडणे पंच क्रोशी
सोमनाथाच्या कवेत
पिर, सातेरी, घिरो, कुळगत
बालपणी गिरवीले घडे याच्या कुशीत
आज ही तो स्मरे
ती शेती, त्या काजू
ते आंबे, फणस, नारळ
झरे, ओहळ, खळखळ
आजही कानी घुमे नाद
कसा विसरू संगी, साथी
जे लाभले बालपणी
ती आईची माया
तो मोठा परिवार
आठवे सगळे आजही
चतुर्थी, दिवाळी गोडधोड सण
असा माझा सुंदर गांव
निसर्ग मनोहर हिरवागार
शेतकरी, कष्टकरी
जिथे सदोदित गाळी घाम
त्या गावचा मला अभिमान
बाळगेन मी मनी निशिदिन

# निशाणी

प्रत्येकाचा एक कालावधी असतो
त्या कालावधीत
तो जे करतो
त्यात त्याला यश येते
तो त्याचा
'परीस स्पर्श' कालावधी असतो
त्याच्या आयुष्यात तो
'सुवर्ण काळ' असतो
एकदाची त्याची
चाहुल लागली की
भराभर त्यात त्याने
हात धुऊन घ्यायला हवेत
त्या कालावधीत
चोहो बाजूनी योग जुळून येतो
सर्वांचे सहकार्य लाभते
आणि कठीण काम
सोपे होऊन जाते
मग त्या कालाच्या स्मृती
चिरंतर मागे राहतात
'निशाणी' बनून

# धागा

कोटी कोटी या देशाची जनता
मानते आपुली भारत माता
सांगते जगाला नाते न भिता
गर्वाने ठेवून ताठ माथा
तूज साठी मरण ते जनन
सतत ठेवून हर दिन भान
करी रक्षण वीर पूत्र जवान
देऊन नारा 'जय जवान, जय किसान'
न इथे कुणी हिंदू, मुस्लीम
शिख, इसाई सारे माने देशप्रेम
विविधतेचा घडे इथे संगम
महासत्तेचा हा तर आहे उगम
इथे वाहते बुध्दीमत्तेची अखंड गंगा
विरश्रीचा इतिहास दिपवी साऱ्या जगा
संस्कृतीने व्यापीला इंच इंच जागा
बांधूया मनगटी अखंडतेचा धागा

# समोरचे झाड

समोरचे झाड
दिसते किती छान
वाऱ्याच्या संगे
डोलवी मान

समोरच्या झाडावरी
पक्षीकरी किलबील
झाडाच्या खाली नाचती
गुरे धरूनी ताल

समोरचे झाड
दिसते हिरवे गार
थकलेले वाट सरु
झोपे डेरेडार

समोरचे झाड
वर्षे झाली फार
सोसते उन्ह पाऊस
आहे उभे खंबीर

समोरचे झाड
नाही कुणा त्रास
सोबतीस साऱ्याना
घेऊन बसे पास

समोरचे झाड
आहे सगळयाना साक्ष
येती किती जाती किती
कुणाचा नाही दुस्वास

# प्रांगण

जीवनाच्या या भव्यप्रांगणी
मी असे एक वाळू कण
धडपडतो जगण्या या रणी
जाऊनी दैवाला शरण

करण्या काम फार समोर
जणू आहे महामेरू
दे प्रभो, दे शक्ती प्रखर
शकू पूर्ण हरकाम करू

आहे मनी लालसा फार
घडो काम हातून मोठे
जे राहील याद चिरंतर
न पडो या कामी कमी कोठे

आहे मनी याची खबर
होतील यातना अमाप
नाही याचे भय तिळभर
होईल नाव एकदिन खूप

# सुखदु:ख

जीवन म्हणजे सुखदु:खाची
उन सावली
सुखात आपण हर्षीत होतो
दु:खात हताशा होऊन बसतो
सुखाचे सारे वाटेकरी
दु:खात कुणी साथ न करी
रीत जगाची हीच खरी
सुख समजतो राई एवढे
दु:ख पर्वता समान
सुखाचे सारे पुजारी
दु:खाला नसे कुठे स्थान
सगळेच क्षण असावे जीवनी
न पेक्षा कळणार कसे महत्व
दु:ख काय सुख काय
अनुभवाने माणूस बनतो परिक्व
कुणी असे न समजावे
राहते ती स्थीती कायम
अंधारा मागून प्रकाश येतो
कालचक्राचा हा निसर्ग नियम

# राम जन्मभूमी

ऐकून ऐतिहासीक
राम जन्मभूमीचा निवाडा
झाली आनंदीत सारी
भारतीय जनता

त्या रामाने सोसीला
चौदा वर्षे वनवास
ह्या रामाने भोगील्या
साठ वर्षाच्या यातना

झाला खुला मार्ग मंदिराचा
आता न उरल वाद
नव सौख्याचे बनवू प्रतिक
घडू दे देशाची एकता

असो हिंदू असो मुस्लीम
विश्वास तो न्याय देवतेवर
धन्य ते तीन सुपूत्र
ज्यानी साधीली एकात्मता

आता घडवू देश बलवान
घेऊनी हात हाती
गाडू पुरूया जुनी जळमटे
वंदू या अखंड भारत माता

# धरणीमाता

नको मानवा घालू घावा
करितो धावा तुझ्याचरणी
मीच तुझा ध्यास मीच तुझा श्वास
मीच तुझा प्राण तरीयेई शरण
नको तोडू , नको झोडू
नको फोडू, नको मोडू
नदी, नाले, सागर, पाणी
डोंगर, वृक्ष ही वनराणी
सारे करीती तुझे रक्षण
का बनसी तू अजाण
ही धरती असू माता तुझी
का नच  येई किव तिची
तिज वीण नसे कोणी दुजी
जिला नसे पर्वा स्वत:ची

# मायानगरी

होते मनात भारी
जाण्यास स्वप्न नगरी
इच्छा बालपणाची
सफल कशी करायची
आला तो योग जुळूनी
बांधूनी गणिते मनोमनी
केली तयारी निघण्या
संधीचे सोने करण्या
होती ती अमेरिका वारी
बघण्या झाली राजी स्वारी
केली पुरे पूर तयारी
घेतली एकदाची भरारी
करीता पदस्पर्श भूवरी
संचरीले दिव्यत्व अंगी
दृष्य समोरचे मनोहरी
बघुनी निस्तब्ध झालो जागी
'अहा' निघाले शब्द ओठी
वाटले धन्य कोटी कोटी
समजेना क्षणभर पडोनी विसर
आहे मी स्वर्गी या भूवर

अघात ही निसर्ग किमया
मानवे पालटलवी काया
चोही बाजूनी गगनभेदी
मनोरे आकाशी छेदी

बर्फाच्छादीत म्हणावे की
वर्षाव सफेद फुलाचा सडा
तद्वत ही माया नगरी
की भूवरी  स्वर्थ अवतरी

तो झगामगाट दिपवे नयन
नायगरा की स्वर्गातील गंगा
ओते दुधसागर भरभरून
वाटे मोहक इंच इंच जागा

# महाराजा

तो महाराजा
स्वत:लाच सर्वज्ञ म्हणवून घेतो
नाही निती, नाही चाड
आपलेच म्हणणे खरे
त्याला कशाचेच पडलेले नाही
आपली खूर्ची तेवढी शाबूत हवी
कुणाचे ऐकून घेणे त्याला आवडत नाही
हुकूमशाही वृती
आपण तेवढे बरोबर
बाकी सारे मुर्ख
हुद्दा विसरून बोलणार
कोण काय म्हणेल
त्याचे त्याला पडलेले नाही
अगदी जंगली कायदा
तो खूष
सगळे आपल्याला धाबरतात
त्याला माहीत नाही

पाठीमागे सगळे शिव्या घालतात
शाप देतात ‘लवकर मरो’
म्हणजे आमची सुटका होईल
सगळयाचेच हीत होईल
असतात अशी विचित्र माणसे
दुसऱ्याना झालेले त्रास बघून
त्याना आसूरी आनंद मिळतो
दुसऱ्याना मनस्ताप देणे
हेच त्याच्या आयुष्याचे सार्थक
धन्य तू महाराजा !

# आत्मसंतुष्ट

कधी कधी वाटते
सोडूनी द्यावे सगळे
बसावे निवांत पणी
कुठे तरी जाऊनी एकटे
करावे आत्म चिंतन
काय मिळविले,
काय गमविले
बघावे माणसे अशी का वागतात
मनात होती वेदना
माणूसकी विसरत चालली
वैयक्तिक स्वार्थ फोकावतोय
कुणालाच काही पडले नाही
आम्ही आमची संस्कृती विसरतोय
नाती गोती विसरतोय
फक्त समोरचे बघतोय
केवळ स्वत:पुरते
जग लहान होत चाललेय
संकुचित वृत्ती वाढतेय
एकमेकापासून दूर जातोय
तरीही आपण आत्मसंतुष्ट बसतोय

# घर

घर असावे घरा सारखे
सुंदर निर्मळ आत बाहेर
त्यात असावी सुखशांती
आतिथ्याचे माहेर घर

देव घरात व्हावे पूजन
रोज सुगंध दरवळावा
वात्सल्याचा व्हावा सागर
मायेचा व्हावा शितवा

सगे सोयरे नियमित यावे
आनंदाला उधाण यावे
पाहुण्यानी तृप्त व्हावे
वातावर प्रसन्न बनावे

बाग असावी घरा भेवती
त्यात दिसावी निसर्ग देवता
फुल पाखराचे थवे  घुमावे
मन उदात्त व्हावे बघता

# निरागस

मूल हसते
फूल फुलते
फुलपाखरू
भिरभिरते
वारा झुलतो
सुगंध नेतो
चारी दिशानी
दरवळतो
सागर थयथयतो
किनारा कापतो
भयभित होऊन
मागे हटतो
चंद्र चमकतो
चांदणे पसरवितो
प्रेमीकाना
प्रफुल्लीत करतो

# तुझ्या सोबतीत

तुझ्या सोबतीत मी
राहिलो न मी माझा
झालो कधी तुझा मी
न कळले मला ।तुझ्यासोबतीत
तुझा सहवास जातो
देऊन मस्त सुगंध
राहतो दरवळत
दिन भर धुंद ।तुझ्यासोबतीत
फुलती गाणी ओठी
तरंगुनी आनंद देही
जातो मान विसरूनी ।तुझ्यासोबतीत
ही जादू कसची मज
नच ठावे आजवरी
अगाध ही करणी लागे ओढ फार ।तुझ्यासोबतीत
राहो देवा प्रभो चरणी
मागतो करूनी धावा
राहो सदा मन हे प्रफुल्लीत ।तुझ्या सोबतीत।

# मी काय करू ?

बायको म्हणते
सकाळी उठता बाहेर पडता
रात्र झाल्यावर घरी येता
घराकडे, मुलाकडे लक्ष नाही
संसारात लक्ष घालत नाही
मुलांवर संस्कार नाहीत
मला मुले ऐकत नाहीत
मी काय करु ?
माझा होतो कोंडमारा
समाजसेवे शिवाय करमरत नाही
लक्ष द्यायला पुरेसा वेळ नाही
हेही पाहिजे आणि तेही पाहिजे
दोन्ही बरोबर साधत नाही
मी काय करु ?

# हे प्रभो

तुझ्या कृपेने झालो धन्य
तूच आम्हा होई पावन
प्रभो, तूज वीण व्यर्थ हे जीवन

तू सगळयाचा तारण कर्ता
तू सर्वाचा विघ्न हर्ता
तुलाच वाटे सर्वांची चिंता

या जगी तूच श्रेष्ठ
तूज वीण नसें कुणी जेष्ट
सर्वासाठी तू झेली कष्ट

तुला नसे भय कुणाचे
तू असे भाग्य सगळयाचे
तूज ठाई असे स्थान हक्काचे

# आयुष्याच्या काठावरूनी

आयुष्याच्या काठावरुनी
मागे वळूनी बघताना
उजाळूनी येती स्मृती नाना
त्यात दिसते बालपण
आईचे गोंजारणे
भावंडा सवे बागडणे
सवंगडया सवे खेळणे
घेऊनी कष्ट अपार
केले विद्यार्जन पूर्ण
लाभले गुणी गुरुजन
घातला मजबूत जीवन पाया
आज उभा मी त्या पायावर
आठवे ते सारे गुरूवर्य
तारूण्याच्या ऐन तटावर
भेटले जीवलग साथी
घेऊनी हात त्याचा हाती
केली सुरु समाज सेवा
अनेक अंगे तुडवत
केली उभी अनेक दालने
लाभले त्यात यश भरघोस
बघूनी लोकसेवा
बनविला गेलो राजकरणी
लाभला विपूल पाठींबा
त्या पदाचा केला सद्‌उपयोग
लावण्या अनेक योजना मार्गी
आज चाखिती जन
त्याची मधूर फळे

# महापूर

स्वप्नात माझ्या दिसला
एक महापूर
त्या महापूरात गाडी आमची वाहत चालली
मध्येच मी गाडीतून बाहेर फेकला गेलो
काठावरून चाललो आहे
गाडीतील अन्य बुडणार आहेत
पाण्याच्या भोवऱ्यात
गाडी गाडली जाणार आहे
काही प्रेते वाहत येत आहेत
काही गटांगळया खात आहेत
मी फक्त बघत आहे
चोहो बाजूनी लाल पाणी
जोराने वाहत आहे
पाणीच पाणी धावत आहे
मती सून्न होऊन मी बघतो आहे
निसर्गाचा हा कोप
मोठ्याने ओरडतो आहे
धावा धावा म्हणतो आहे
कुणी मदतीला येत नाहीत
माझाच टाहो माझ्या कानी पडतो
मी खडबडून जागा होतो
'अरेच्या' ! हे तर स्वप्न आहे
बरे झाले सत्य नाही

# भूमिपुत्राच्या मागण्या

ही धरणे हा टाहो
नाही ज्याना ऐकू येत
उठा सारे उठा आता
धडा आपण त्याना शिकवू

हा एस्.टी. समाज सारा
झाला आहे जागृत आता
नाही त्याला थोपवू कुणी
या भूमीपूत्राला आता

युगे युगे हाल अपेष्टा
सोशिल्या ज्यानी अफाट
तोच लागला गर्जू झगडू
आपूल्या न्याय हक्कासाठी

एकवटून उठा पेटून
नाही भिती तुम्हा कुणाची
घटनेच्या रास्त मागण्या
नाही ठेवू कुणी वंचित

तू आहे मर्द मराठा
आहे शक्ती तुझ्या मनगटी
नमव सरकार तुझ्यापायी
होऊ आम्ही विजयी

# यशोगाथा

स्वराज्यासाठी ज्यानी दिल्या आहुत्या
घेऊनी उडी रणी धगधगत्या
होऊनी आज त्याच्या विजयी पताका
जणू नभी झळकती तेजाळू तारका
त्या शूर विराची यशोगाथा
ज्यानी झेलल्या माथी लाथा
मातृभूमीचा हर सुपूत्र गातो
होऊनी लीन त्याना वंदितो
ज्या देशाची थोर परंपरा
अखंड गातो विश्व सारा
अभिमान आम्हा बलिदान करण्या
त्या देशाचे स्वातंत्र्य रक्षण्या
कोटी कोटी या देशाची जनता
विसरून सारे भेद विविधता
दाखविक दुश्मनाला फाडण्या चिंधड्या
घेऊनी पेटत्या रणागंणी उड्या

# जीवन

माणूस दोन जीवन उपभोगतो
एक दिवसा
एक रात्री
दिवसाचे जीवन वास्तविक असते
रात्रीचे जीवन स्वप्नातले असते
जे वास्तवात शक्य नसते
ते स्वप्नात शक्य होते
स्वप्नातले जीवन क्षणभंगूर असते
पण त्यालाही वेगळे महत्व असते
स्वप्नात वावरलो नसतो
तर जीवन रुक्ष झाले असते
स्वप्नातले जीवन वास्तवात
आणण्यासाठी जो प्रयत्नाची
पराकाष्टा करतो
त्यालाच ती स्वप्ने
साध्य होतात
ती वास्तवात रूपांतर होतात
मग दोघातली दरी ही
एकमेकात मिसळून जाते
ते एक
निर्मळदाई जीवन असते

# मी कोण

कुणी मला म्हणती
मी समाजकारणी आहे
तर कुणी म्हणती
मी राजकरणी
कुणी म्हणे मला शेतकरी
तर कुणी म्हणे मला शिक्षक
काहीना वाट मी नाटककार
चित्रकार, कवी, लेखक, साहित्यप्रेमी
तर काहीना दिसे माझ्यात सहकार
काहीना दिसे चित्रकार
काहीना वाटे मी जाणकार
काहीना वाटे मार्गदर्शक
मी कोण आहे ते
मलाच माहित नाही
मी मी आहे
जो जाणतो आहे
फक्त सेवा, लोक सेवा
कोणत्या ना कोणत्या रूपाने
नेहमी घडो सेवा
हेचि मागतो सदोदिन
प्रभो चरणी

# १६ डिसेंबर २००९

तारीख सोळा डिसेंबर
जमला पणजीला एस.टी महापूर
मांडवी दोन्ही पूलावरून
लागला तुडुंब वाहू
घडली एक ऐतिहासीक घटना
धडकला जनसमुदाय सारा
गाठण्या विधान सभा
करूनी पार पोलिस अडथळा
ती धकधकती युवा सेना
लागली करू गर्जना
द्या आम्हा आमुचे हक्क
नाही मागत आम्ही भिक
तो आवाज घुमला गगनी
झाली ठप्प सारी वाहतूक
मध्येच पडली अडकून
देत शिव्या सरकारा लाख
मोडण्या अफाट मोर्च्या
झाले पोलिस अती सज्ज
करोनी लाठीमार, पाणी बंब
नाही शकले चिरडू कोणा
हा उद्रेक का जनक्षोभ म्हणावा
जाण जाणत्या जाण
न बघ डोळे मिटूनी अंत
टाक देऊनी त्यांचे न्याय अधिकार

# पालापाचोळा

आम्ही करतोय काय
आम्हाला ठाऊक नाही
आम्हाला जायचे कुठे
आम्हाला ठाऊक नाही
आम्ही भरडून जातोय
जात्यातील दाण्यावाणी
आम्हाला वापरला जातोय
पाल्यापाचोळया वाणी
आम्ही झालोय वापराफेका
नाही कुणी उरलाय वाली
काय झाली ही दैना
लाज लज्जा नाही उरली
विचार वंता जागा हो
घेऊनी पुढाकार सज्ज हो
करण्या तारण बुडते जहाज
कर एकत्र सारा समाज

# घडू दे

फाडू दे फाडू दे
आकाश सारे फाडू दे
पडू दे पडू दे
झाडून पाऊस पडू दे
खेळू दे खेळू दे
मूले पोटभर खेळू दे
फुलू दे फुलू दे
बाग सारी फूलू दे
रडू दे रडू दे
रडणारे मूल हसू दे
होऊ दे होऊ दे
सारे मुले पास होऊ दे
लाभू दे लाभू दे
साऱ्या जगी शांती लाभू दे
घडू दे घडू दे
साऱ्याच्या मनासारखे घडू दे
मिटू दे मिटू दे
वाद सार मिटू दे
सरू दे सरू दे
दुःख सारे सरू दे
येऊ दे येऊ दे
सुख दारी येऊ दे
उजळू दे उजळू दे
सारे जग उजळू दे

# माणसास

माणसा, अजब तुझा कारभार
नाही आचार, नाही विचार
नाही शिक्षण, सदा दुराचार
त्याच्या हाती दिला तू राज्य कारभार
माणसा, अजब........
लोकसेवेची चाड नाही
उद्याचे काही पडलेले नाही
जो गुंग भरण्या स्वघर
त्याला तू बसविले सिंहासनावर
माणसा, अजब.........
जो झालास संस्कृती पलीकडचा मुकटमणी
सदा झाला लीन त्याच्या चरणी
झाले जे सदा गुन्हेगारांचे आगर
त्यालाच बैसविले वैभव शिखरावर
माणसा, अजब.........

# सवय

कधी तिने मान्य केले नाही
आपल्याला वेळ होतोय
कधी तिला जमले नाही
सोडण्या एकदा जडलेली सवय
नेहमी ती वाद घालायची
कधी मानायला तयार नसायची
आपल्यामुळे दुसऱ्यांचा खोळंबा होतोय
आपण कुणाला तरी ताटकळत ठेवतोय
सोसतोय हे सारे पदरी पडल्यापासून
उपाय नाही निमूटपणे सारे सोसतो
जो घेतो चूक मानून
तोच सुधारण्याचा प्रयत्न करतो
राग यायचा मनोमनी फार
आतल्याआत कोसायचा
दात ओठ खायचा वारंवार
पदरी पडले पवित्र झाले मनोमनी मानायचा

# डोळे

त्या डोळयात पाहिले
मी एक रूप
जे दिसले केवळ मला
त्या रूपात काय होते
कळले न मला

डोळे बोलत होते
रूप हासत होते
मी मंत्रमुग्ध होऊन
बघत राहिलो एकटक

क्षण दोन क्षण जाता
गेले रूप लोपून
ते स्वप्न होते की भास
माझे मलाच कळले नाही

हा असा आभास का व्हावा
नच उमगे कधी या जीवा
त्या डोळयात मात्र मी
माझे मी पण हरपून गेलो

# मन

मन कधी कुणावर
का बसावे
याला नाही नेम
ते बसते न कळत
होऊनी स्वप्न फुलपाखरू
बसता एकदा एकावर
जाते होऊनी घट्ट
सुटता मग नाही सुटत
जाई मन पतंग वरवर
घेऊनी घिरट्या आकाशी
संगे सोबती दोघी
अंतरीचे सादित संवाद
बहरे चित्त होऊनी प्रफुल्ल
नाही त्याला कुणी अडवू
नाही त्याला कुणी तुडवू
धावे ते प्रकाश गतीने
गांठण्या आपुले लक्ष

# तारणकर्ता

सुंदर माझा गोवा हो हो
होता कधी काळी
आज लागली दृष्ट वाकडी
घसरण सुरू झाली हो हो
निसर्ग रम्य म्हणूनी जगभर
होती गाजत किर्ती
घ्यावया दर्शन जवळून
गर्दी तुडंब उसळत होती
आज लागले होऊ ओस किनारे
परदेशी लागले पाठ फिरवू
बघूनी नद्या, नाले रक्ताळू
डोंगर माथे लागले अश्रू ढाळू
माणसातील आपुलकीचे झरे
लागले आटू वाढूनी सुकती
होऊ लागलो आपणच परके
परदेशी गेली इथली माती
कोण करेल याचे चिंतन
कोण करेल याचे रक्षण
जो तो आहे आपल्यातच गुरफटून
कुणी न दिसतो कर्ता तारण

# क्षमा

घडल्या असेल कधी
चार चुका हातून
परी मन माझे आहे निर्मळ
जाणून बूजून न केला
कधी कुणाचा तिरस्कार, अपमान
मी नसे कुणी देव
मी तर आहे मानव
चुकणे हा तर आहे
मानवाचा स्वभाव धर्म
चांगल्याचीच धरीली कास सदा
वावरलो मी सदा सर्वदा
घेऊनी विचार पोटी उच्च कोटी
न धरता भेदभाव मनी
केली जनसेवा कर्तव्य मानूनी
जरी असेल दुखविले मन कुणाचे
नसेल कुणा कधी रूचले वागणे
न धरीता मनी किंतु
मागतो क्षमस्व सर्वांचे
हे प्रभो, कर सुसय्य जीवन जगणे

# मोबायल

सगळेच पडले त्याच्या मोहात
लहान थोर गरीब श्रीमंत
नाही त्याच्या शिवाय करमरत
सगळयांच्या गळयांतला झाला ताईत
तो आहे मोबाईल हो
भाजीवाली मासे वाली
विद्यार्थी आणि नोकरीवाले
भिकारी सुध्दा वापरी हो
कोणीही त्याला नाही सुटला
ज्याच्या त्याच्या हाती मोबाईल हो
क्षणात बातमी देऊन जातो
कुणाला हसवी, कुणाला रडवी
त्याचं त्याला पडलेलं नाही
आपलं काम नेक करी
साऱ्याचा मित्र मोबाईल हो
वापरा त्याला सांभाळून
नाही सोडू त्याला ''लूज''
बसेल एक दिन तुमच्या माथी
आवरा सारे हो त्याला आवरा
ठेवा मुठती तुमचा मोबाईल हो

# भारतमाता

भारत माते तुला वंदितो
स्पर्शूनी तव चरण
तू सर्वाचे केले रक्षण
लावूनी पणाला प्राण
तुझे पूत्र ते वीर सहस्त्र
पडले शत्रूवर तूटून
न करता पर्वा जीवाची
लावीले परतून मुडदे पाडून
सार्थ आम्हा तुझ्या अभिमान
तू सर्वाचे पूज्य स्थान
तुला नसे कुणी हिन-दीन
तुझ्या चरणी सर्व पावन
किती वर्णावी तुझी महती
जगी उच्च तुझी संस्कृती
दिले जगास तू श्रेष्ठ पुराण
गाती त्याचे सारे गुणगान
महा सत्तेचे तुज लागले वेध
अवश्य गाठू विसरूनी भेद

# महागाई

महागाई, महागाई, भिडली गगनाला
कंबरडं, कंबरडं मोडलं जनतेचे
झाली जनता त्रस्त, झाला आम आदमी जाम
मंत्री, आमदार झाले शिरजोर
कोणाचा पायपोस कोणाला नाही
कोणाला त्याचे पडलेले नाही
काय घेऊ काय नको सगळेच झाले महाग
खायंच काय गरीबानं, सुकलं तोंडाचे पाणी
कमाई कमी अन् खायची पोटं जास्ती
नाही थोपऊ तिला कुणी
तोंडाची वायफाळ बडबड जास्त
आरोपाच्या मात्र फैऱ्या झाडी
कसं जगावं कुठं जगावं
आला हो जीव मेटाकुटीला
नाही नाही आणखी जगवत नाही

# अश्रूपाणी

जीव घुटमळतो तुझ्या भोवती
का लावला लळा या जीवा
होतो मी साधा भोळा
गेला पतंग तूटूनी वरती

आज स्मृती होऊनी ताज्या
घाली घिरटया हृदय मंदिरी
कुणा सांगू वेदना माझ्या
चाचपडतो मी घोर अंधारी

निळया सागराची साक्ष होती
गेली विरूनी ती वाळू कणी
शपत मनीची विझली पणती
अंधार सावलीत झाले आश्रूचे पाणी

# सहकार

सहकार माझा ध्यास
सहकार माझा श्वास
सहकार माझा हव्यास
सहकार म्हणजे विश्वास
सहकारी म्हणजे प्रयास
सहकार म्हणजे विकास
सहकारातून माणूस घडतो
वेगवेगळे अनुभव मिळवितो
नवी नवी निर्मिती घडवितो
सहकारात आहे सर्व काही शक्य
यात काही नाही अशक्य
माणूस हवा जिद्दी आणि प्रामाणिक
सहकाराला जोड संस्काराची
होते मग निर्मिती मांगल्याची
वृध्दी सुखशांती समृद्दीची
सहकाराचा लाभ नसतो एकटयाला
लाभ होतो साऱ्या समुदायाला
सहकार्याचे जाळे वाढविणाऱ्याला

# आईस

तुझ्या सावलीत वाढलो
तुझ्या सावलीत घडलो
तुझ्या सावलीत शिकलो
तुझ्या सावलीत मोठा झालो
तूच दिलीस जगण्या शक्ती
तूच दिलीस स्फूर्ती
तूच माझी भक्ती
तूच माझी महती
तूच माझी देवता
तूच माझी गाथा
तूझ्या चरणी माझा माथा
नित्य लवती सदा झुकता
तूच दिले अंगी बळ
ममतेने जिंकण्या सबक
तुझ्याच कृपे झालो सबळ
तूच देई यश प्रबळ

# प्रेयसी

माझी एक प्रेयसी आहे
तिला कुणाचेच बंधन नाही
ती मला भेटायला कुठेही येते
कधी ही येते, ठावठिकाणाची
जरूरत नाही
हवेत येते, झोपेत येते
कामात असताना येते
आंघोळ करताना येते
तिचा मला अडथळा वाटत नाही
तिला कधी बोलवावे लागत नाही
कधी फोन, एस एम एस करावा लागत नाही
ती आपणहून येते
गुदगुल्या करायला लागते
मला तिचा राग येत नाही
ती आल्यावर मला स्फूरण येते
आणि मग मी पूर्णता तिचा होतो
सर्व देहभान विसरून
तिच्यात तल्लीन होतो
आणि मग नविन
अपत्याचा जन्म होतो
एक नविन 'कविता'
जन्माला येते
एक सुखद
अनुभव देवून जाते

# मायभूमी

उंच आमुचा झेंडा
उंचच आम्ही ठेवू
मायभूमी साठी
प्राण पणाला लावू

नाही कुणाची आम्हा भिती
नाही कुणाची छाती
बघण्या आम्हा नजरवाकडी
दाखवू त्याना देश धडाडी

कोटी कोटी या देशाची
जनता बनून झांसी राणी
भगत सिंह बाबू गेनू
खेळेल रक्ताची होळी

आज अफाट शक्ती आमुची
बघूनी दिपे सारे जग
तोडीस तोड देण्याची
ताकद आहे मनगटी अभंग

हर वीर या मातीतला
बनून शूर जवान रणी
जाईल सामोरी शत्रूला
पाजण्या धारातीर्थी पाणी

बनूनी छातीची ढाल
अडवू हर पावन खिंड
दाखवू या बाजीप्रभूचे बळ
रक्षण्या देश थोपटूनी दंड

# चातक

ओठी जे गीत गुणगुणते
ते तुझ्यावर रचते
मनात जे सुचते
ते ओठी पुटपुटते
ते गीत नसे ती प्रीत
होई अंतरीतून व्यक्त
होई दुरावा न सहन
फिरते तुझ्याच भोवती मन
माझ्या मनी जे वाटे
तुझ्या मनी का ते उमटे
जीव जीवात बिलगाया
होई कासावीस काया
प्रितीने प्रित फुलते
तुज ते का न कळते
तू येशील एकदिन म्हणूनी
पाही वाट चातक बनूनी

बी. जे. पी. S.T. मोर्चा - केंद्रीय खजीनदार

आशीर्वाद सेंटर - अध्यक्ष

गोवा राज्य सहकारी बँक - माजी अध्यक्ष

केपे लोकोत्सव संघ - अध्यक्ष

गोमंतक वेळीप समाज संघ - अध्यक्ष

उटा - अध्यक्ष

केपे लोकसेवा मंडळ - अध्यक्ष

गोमंतक गौड मराठा समाज - सल्लागार

जनसेवा मंडळ - अध्यक्ष

ज्ञानदुर्गा एज्युकेशन सोसायटी - संस्थापक अध्यक्ष

दयानंद बांदोडकर हाई स्कूल - मुख्याध्यापक

सुभाषचंद्र वाचनालय - संस्थापक अध्यक्ष

दयानंद बांदोडकर शाळा समूह - अध्यक्ष

गोवा राज्य - माजी उपसभापती

गोवा राज्य - माजी मंत्री

भारतीय जनता पक्ष - उपाध्यक्ष

२४वे गो. म. सा. सम्मेलन - स्वागताध्यक्ष

प्रकाश शं. वेळीप ट्रस्ट - अध्यक्ष

श्री पाईक देव युनिटी फार्म - संचालक

केपे अर्बन क्रेडिट सोसायटी - अध्यक्ष

आदर्श कृषी सहकारी संस्था - अध्यक्ष

केपे गृह तारण सहकारी संस्था - अध्यक्ष

कुशावती मासिक - अध्यक्ष

२३वे स्वा. सावरकर सम्मेलन - स्वागताध्यक्ष



***परिचयः-***

माजी मंत्री

शिक्षण, कला व संस्कृती, सहकार

पंचायत, माहितीखाते, पुरातनखाते

मच्छिमारखाते,

***चेअरमनः-***

केपे अर्बन को. क्रे. सोसायटी, केपे,

आदर्श कृषी सहकारी संस्था, बाळ्ळी

केपे तालुका गृहतारण सहकारी संस्था

***अध्यक्षः-***

युनायटेड ट्रायबल असोसिएशन अलायन्स (UTAA)

गोमंतक वेळीप समाज

आशीर्वाद, रिहेबीलीटेशन अलकोहोलिक सेंटर

प्रकाश शंकर वेळीप ट्रस्ट

***मुख्याद्यापकः-***

दयानंद बांदोडकर हाई स्कूल- गोकुल्डे

***स्वागताध्यक्षः-***

२४ वे गोमंतक मराठी साहित्य संमेलन व केपे

२३ वे स्वा. सावरकर साहित्य संमेलन, फातर्पा